# महाराष्ट्र शासन

क्रमांक: ताबिके-२०२२/प्र.क्र.८०/१३-अे
कृषि व पशुसंवर्धन,दुग्धव्यवसाय विकास व
मत्स्य्व्यवसाय विभाग,
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई-४ ०० ०३२
दिनांक: २६ जुलै,२०२३

**विषय**:- अंबाजोगाई गित्ता-जवळगांव रस्ता रुंदीकरण करण्याकरीता वसंतराव नाईक मराठवाडा कृषि विद्यापीठ, परभणी अंतर्गत गळीतधान्ये संशोधन उपकेंद्र, अंबाजोगाई येथील सर्व्हे क्र.१६५ मधील रस्त्यालगतची ० हेक्टर ६८ आर जमीन संपादीत करण्यासाठी परवानगी मिळणेबाबत.

**ज्ञापन :**

शासन निर्णय क्र.टिएसएफ-१०७२/११३३६५/अे-१, दि.०४/१२/१९७३ च्या शासन निर्णया अन्वये प्रतिवर्ष प्रति प्रक्षेत्र रु.१/- नाममात्र भाडयाने (१) तालुका बिज गुणन केंद्र, अंबाजोगाई, जि.बीड, (२) कृषि संशोधन केंद्र, सोमनाथपूर, जि.लातुर व (३) कृषि संशोधन केंद्र, तुळजापूर, जि.उस्मानाबाद येथील एकूण २२०.२० हेक्टर प्रक्षेत्र स्थावर मालमत्तेसह वसंतराव नाईक मराठवाडा, परभणी यांना लीज बेसीसवर जमीन हस्तांतरीत झालेली आहे. त्यापैकी गळीतधान्य संशोधन उपकेंद्र, अंबाजोगाई यांच्या अधिनस्त एकूण १५.३९ हेक्टर क्षेत्र आहे. गळीतधान्य संशोधन केंद्र, अंबाजोगाई यांच्याकडील एकूण १५.३९ हेक्टर जमीनीपैकी अंबाजोगाई गित्ता-जवळगांव रस्ता रुंदीकरणासाठी आवश्यक असलेली सर्व्हे नं.१६५ मधील रस्त्यालगतची ० हेक्टर ६८ आर जमीन गळीतधान्य संशोधन उपकेंद्राच्या उत्तर बाजूस अंबाजोगाई गित्ता-जवळगांव रस्ता व वस्ती असून त्या बाजूस संरक्षण भिंत नसल्यामुळे प्रक्षेत्रावर पेरलेल्या पिकांचे मोकाट जनावरे, रानडुकरे व वाटसरु यांच्या त्रासामुळे मोठया प्रमाणात पिकाचे नुकसान होते. सदरील जमीनीचा मावेजा विद्यापीठास जमा करणे व संरक्षण भिंत बांधून देणे आवश्यक असल्याचे विद्यापीठाने कळविले आहे.

२. प्रस्तुत जमिन ही कृषि विभाग, महाराष्ट्र शासन, तालुका बिज गुणन केंद्र, अंबाजोगाई, जि.बीड यांच्या नावावर आहे. तालुका बिजगुणन केंद्राच्या जमिनी या तालुक्यांचा विकास होताना शहरी भागात आल्याने विविध खाजगी, व्यापारी, सहकारी, शासकीय, निमशासकीय, संस्थांकडून तालुका बिजगुणन केंद्रांच्या जमिनींची मागणी वेगवेगळ्या प्रयोजनासाठी करण्यात येते. म्हणून शासनाने, शासन परिपत्रक क्र.ताबिके २०११/प्र.क्र.४३/१-ए, दि.८ सप्टेंबर, २०११ अन्वये तालुका बीजगुणन केंद्राच्या जमिनी कृषक अथवा अकृषक कामासाठी न देणेबाबत धोरणात्मक निर्णय घेतलेला आहे.

३. शासनाने दि.०८/०९/२०११ अन्वये तालुका बीज गुणन केंद्राच्या जमिनी कृषक अथवा अकृषक कामांसाठी न देणे याबाबत धोरणात्मक निर्णय घेतला आहे. परंतु रस्त्याचे प्रयोजन हे व्यापक जनहित पाहता अंबाजोगाई गित्ता-जवळगांव रस्ता रुंदीकरण करण्याकरीता वसंतराव नाईक मराठवाडा कृषि विद्यापीठ, परभणी अंतर्गत गळीतधान्ये संशोधन उपकेंद्र, अंबाजोगाई येथील सर्व्हे क्र.१६५ मधील रस्त्यालगतची ० हेक्टर ६८ आर जमीन संपादीत करण्यासाठी जागा उपलब्ध करुन देणे आवश्यक आहे.

४. अंबाजोगाई गित्ता-जवळगांव रस्ता प्रजिमा-५८ रस्ता रुंदीकरणासाठी वसंतराव नाईक मराठवाडा कृषि विद्यापीठ, परभणी अंतर्गत गळीतधान्य संशोधन उपकेंद्र, अंबाजोगाई येथील ग्रामीण सर्व्हे न.१६५ मधील उजव्या बाजूची ० हेक्टर ६८ आर जमीन संपादीत करण्यासाठी सार्वजनिक

बांधकाम विभागास हस्तांतरीत करण्याकरिता महसूल व वन विभागाकडे प्रत्यार्पित करण्याचा निर्णय राज्य शासनाने घेतलेला आहे. त्याअनुषंगाने सदर जमीन महसूल व वन विभागाकडे प्रत्यार्पित करण्यात येत आहे.

५. महसूल व वन विभागाच्या आदेशानंतर जमीन वाटप करताना जमिनीचा निश्चित कोणता हिस्सा प्रत्यार्पित करावयाचा आहे, या संदर्भात जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी, बीड यांच्या सल्ल्याने जिल्हाधिकारी, बीड यांनी जमिनीचे आरेखन निश्चित करुन व मोजणी करुन जमीन हस्तांतरणाबाबतची कार्यवाही करावी.

हे ज्ञापन महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात आलेले आहे. त्याचा संगणक सांकेतांक २०२३०७२६१५४४४८१६०१ असा आहे. हे ज्ञापन डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

HEMANT GORAKHNATH MHAPANKAR

Digitally signed by HEMANT GORAKHNATH MHAPANKAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=AGRICULTURE AND ADF DEPARTMENT, 2.5.4.20=1775f5c28a439e88c4c15ab3f88d6a6beb26ad2675a8c7a7ff397b2e5305303d, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=6756123D309547BB1E152A6AEB6042BDE4040836DF541FD3620CA87FF8E71CC5, cn=HEMANT GORAKHNATH MHAPANKAR
Date: 2023.07.26 15:45:43 +05'30'

**( हे. गो. म्हापणकर )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. अपर मुख्य सचिव (महसूल ), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई
२. अपर मुख्य सचिव (कृषि ), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई
३. आयुक्त (कृषि), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
४. जिल्हाधिकारी, बीड.
५. कुलसचिव, वसंतराव नाईक मराठवाडा कृषि विद्यापीठ, परभणी
६. संचालक (निविष्ठा व गुणनियंत्रण), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
७. संचालक (विस्तार व प्रशिक्षण ),कृषी आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
८. महाव्यवस्थापक (प्रशासन) महाराष्ट्र राज्य बियाणे महामंडळ, अकोला
९. उप सचिव (निविष्ठा व नियंत्रण ) कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई.
१०. उप सचिव (विद्यापीठ), कृषि व पदुम, मंत्रालय, मुंबई
११.सर्व कृषि संचालक, कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
१२. सर्व विभागीय कृषि सहसंचालक
१३. जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी, बीड
१४. जिल्हा कोषागार अधिकारी, बीड
१५. महालेखापाल, महाराष्ट्र-१/२ (लेखा परिक्षा / लेखा अनुज्ञेयता) मुंबई / नागपूर.

प्रत, माहितीकरिता सादर,

१.मा.मुख्यमंत्री, यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई
२.मा.मंत्री (फलोत्पादन), यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई